## सृष्टीची कथा

**१** प्रारंभी देवाने आकाश व पृथ्वी निर्माण केली २ पृथ्वी उजाड व ओसाड होती. अथांग सागरावर अंधार पसरलेला होता. पाण्यावर देवाचा आत्मा विहरत होता. ३ मग देव म्हणाला, 'प्रकाश होवो!' त्याबरोबर प्रकाश पडला. ४ प्रकाश चांगला आहे असे देवाला दिसले.तेव्हा त्याने प्रकाश व अंधार अलग केले. ५ प्रकाशाला देव दिवस म्हणाला आणि अंधाराला रात्र म्हणाला. संध्याकाळ झाली; मग सकाळ उजाडली. हा पहिला दिवस.

६ देव पुढे म्हणाला, 'पाण्याच्या मध्यभागी पोकळी निर्माण होवो व त्यामुळे पाण्याचे दोन भाग होवोत!' तसेच झाले. ७ याप्रमाणे देवाने पोकळी बनविली आणि पोकळीखालील व पोकळीवरील असे पाणी विभागले. ८ पोकळीला देव आकाश म्हणाला. संध्याकाळ झाली. मग सकाळ उजाडली हा दुसरा दिवस.

९ मग देव म्हणाला, 'आकाशाखाली असलेल्या साऱ्या पाण्याचा एक साठा होवो आणि कोरडी जमीन दिसून येवो!' तसेच झाले. १० कोरड्या जमिनीला देव भूमी म्हणाला आणि पाण्याच्या साठ्यांना समुद्र म्हणाला. हे चांगले आहे असे देवाला दिसले. ११ देव पुढे म्हणाला, 'भूमीवर हिरवळ उगवो. धान्य देणारी वनस्पती आणि बियांसकट फळे देणारी निरनिराळी झाडे भूमीवर उगवोत!' तसेच झाले. १२ त्याप्रमाणे हिरवळ, धान्य देणाऱ्या निरनिराळ्या वनस्पती आणि बियांसकट फळे देणारी निरनिराळी झाडे भूमीतून उपजली. हे चांगले आहे असे देवाला दिसले. १३ संध्याकाळ झाली. मग सकाळ उजाडली. हा तिसरा दिवस.

१४ नंतर देव म्हणाला, 'दिवस व रात्र यात फरक करण्यासाठी आकाशाच्या पोकळीत ज्योती निर्माण होवोत; सणवार, ऋतू, तिथी आणि वर्ष त्या दर्शवोत! १५ आकाशाच्या पोकळीत लावलेल्या या ज्योती भूतलावर प्रकाश पसरण्यासाठी योजिलेल्या असोत!' तसेच झाले. १६ देवाने दोन मोठ्या ज्योती निर्माण केल्या. दिननाथ म्हणून त्यांतली थोरली आणि रजनीनाथ म्हणून धाकटी व तिच्या बरोबर चांदण्या. १७,१८ भूतलावर प्रकाश पसरावा, दिननाथ व रजनीनाथ असावेत, तसेच प्रकाश व अंधार अलग करावेत, म्हणून देवाने नभोमंडळात यांची स्थापना केली. हे चांगले आहे असे देवाला दिसले. १९ संध्याकाळ झाली. मग सकाळ उजाडली. हा चवथा दिवस.

२० मग देव म्हणाला,'असंख्य जीवजंतूंनी जलाशय गजबजून जावोत व पृथ्वीवरल्या खुल्या नभोमंडळात पक्षीगण संचार करोत!' २१ अशा प्रकारे राक्षसी जलचर, जलविहार करणारे निरनिराळ्या प्रकारचे प्राणी आणि निरनिराळ्या जातीचे सपक्ष प्राणी देवाने निर्माण केले. हे चांगले आहे असे देवाला दिसले. २२ 'सफळ व्हा; बहुगुणित व्हा, सागरातले पाणी व्यापून टाका. भूतलावरही पक्षीगण बहुगुणित होवो!' असे म्हणून देवाने त्यांना आशीर्वाद दिला. २३ संध्याकाळ झाली. मग सकाळ उजाडली. हा पाचवा दिवस.

२४ त्यानंतर देव म्हणाला,'हरतऱ्हेचे प्राणी म्हणजे गुरेढोरे, सरपटणारे जीवजंतू व निरनिराळ्या जातीचे वन्य प्राणी पृथ्वी उत्पन्न करो!' तसेच झाले.

२५ देवाने हरतऱ्हेचे वन्य प्राणी, विविध जातीची गुरेढोरे व जमिनीवर सरपटणारे निरनिराळे जीवजंतू बनविले. हे चांगले आहे असे देवाला दिसले.

२६ मग देव म्हणाला, 'आपल्या प्रतिरूपाची व आपल्या समान मानवजात बनवू या. समुद्रातले मासे, हवेत उडणारी पाखरे, गुरेढोरे, पृथ्वीवरील सारे वन्य प्राणी[1] आणि पृथ्वीवर सरपटणारे सगळे जीवजंतू यांच्यावर ते सत्ता गाजवतील!' २७ अशा रीतीने देवाने आपल्या प्रतिरूपाचा मानव निर्माण केला. स्वत:चे प्रतिरूप म्हणून देवाने त्याला निर्माण केले; नर व नारी असे निर्माण केले. २८ देवाने त्यांना आशीर्वाद दिला. देव त्यांना म्हणाला, 'सफळ व्हा.

बहुगुणित व्हा. पृथ्वी व्यापून टाका. तिला अंकित करा. समुद्रातले मासे, हवेत उडणारी पाखरे आणि भूमीवर संचार करणारा प्रत्येक जीव यांच्यावर सत्ता गाजवा!'
२९ देव आणखी म्हणाला, 'हे पहा, अवघ्या भूतलावरील धान्य देणारी प्रत्येक वनस्पती, तसेच बीजयुक्त फळ देणारे प्रत्येक झाड मी तुम्हांला दिले आहे. तेच तुमचे खाद्य.
३० वन्य प्राणी हवेत उडणारी पाखरे आणि भूमीवर सरपटणारे सारे प्राणी यांना खाद्य म्हणून प्रत्येक हिरवी वनस्पती दिली आहे!' तसेच झाले.
३१ आपण निर्माण केलेले सारे काही देवाने पाहिले. ते फार चांगले होते. संध्याकाळ झाली. मग सकाळ उजाडली. हा सहावा दिवस.

२ अशा रीतीने आकाश व पृथ्वी आणि अवघे चराचर पुरे झाले.
२ सातव्या दिवसापर्यंत देवाने आपले कार्य पार पाडले. सातव्या दिवशी आपण करीत असलेले सगळे काम बंद करून त्याने विश्रांती घेतली.
३ सातवा दिवस आशीर्वादित करून तो देवाने मंगल ठरविला. याचे कारण देवाने सृष्टी निर्माण करण्याचे आपले काम तडीस नेले व त्या दिवशी विश्रांती घेतली.
४ आकाशाच्या व पृथ्वीच्या निर्मितीची हकीकत अशी आहे.

**एदेनचे उपवन**

प्रभुदेवाने पृथ्वी व आकाश निर्माण केले.
५ त्या समयी भूमीवर कुठलेच रान, झुडूप नव्हते. अद्याप कुठलीच वनस्पती मळ्यात अंकुरली नव्हती. याचे कारण प्रभुदेवाने भूमीवर पाऊस पाडला नव्हता. जमिनीची मशागत करायला कुणी माणूस नव्हते.
६ परंतु भूमीतून पाणी उफाळून वर येत असे व जमिनीचा सगळा पृष्ठभाग भिजवीत असे.
७ नंतर प्रभुदेवाने जमिनीवरच्या मातीचा मानव घडविला, त्याच्या नाकपुड्यांत प्राणवायू फुंकला तेव्हा मानव जिवंत प्राणी बनला.

८ प्रभुदेवाने मग पूर्वेकडे एदेन येथे एक उपवन तयार केले. आपण घडविलेला मानव त्याने त्यात ठेवला.
९ मग नयनरम्य आणि खाण्याजोगी फळे देणारी अशी सगळी झाडे प्रभुदेवाने जमिनीतून वर येतील असे केले. शिवाय उपवनाच्या मधोमध जीवनवृक्ष लावला आणि बऱ्यावाईटाचे ज्ञान देणारा वृक्षही लावला.

१० नंतर एदेनमधून एक नदी उगम पावली व उपवनाला पाणी पुरवू लागली. पुढे तिला फाटे फुटले व तिचे चार प्रवाह झाले.
११ पहिल्याचे नाव पिशोन. सोने सापडणाऱ्या सबंध हविला देशाला वळसा घालणारी हीच.
१२ त्या देशातले सोने भारीपैकी आहे. तेथे दुर्मीळ अत्तरे व मौल्यवान रत्नेही आहेत.
१३ दुसऱ्या नदीचे नाव गिहोन. साऱ्या कूश देशाला वळसा घालणारी हीच.
१४ तिसऱ्या नदीचे नाव टायग्रीस. असिरिया देशाच्या पूर्वेला वाहणारी हीच. चवथी नदी युफ्राटीस.

१५ एदेन उपवनाची मशागत करायला व राखण करायला प्रभुदेवाने मानवाला तेथे नेऊन ठेवले.
१६ प्रभुदेवाने मानवाला बजावून सांगितले, 'उपवनातल्या कुठल्याही झाडाचे फळ हवे तर खुशाल खा.
१७ मात्र बऱ्यावाईटाचे ज्ञान देणाऱ्या वृक्षाचे फळ तू खाता कामा नये; कारण ज्या दिवशी तू ते खाशील त्या दिवशी तू परशीलच मरशील!'

१८ मग प्रभुदेव म्हणाला, 'मानवाने एकटे असणे ठीक नव्हे. मी त्याला साजेसा जोडीदार तयार करतो.'
१९ सगळे वन्य प्राणी व हवेत उडणारी सगळी पाखरे प्रभुदेवाने मातीची बनवली होती. मानव त्यांना काय काय नावे देतो हे पहायला त्याच्याकडे आणले, तेव्हा मानवाने त्या प्रत्येक जिवाला जे नाव दिले तेच त्याचे नाव पडले.
२० अशा रीतीने सगळ्या गुराढोरांना, हवेत उडणाऱ्या पाखरांना आणि सगळ्या वन्य प्राण्यांना मानवाने नावे दिली. पण त्यात मानवाला साजेसा जोडीदार मिळाला नाही.
२१ पुढे प्रभुदेवाने मानवाला

गाढ झोप लागेलसे केले; तेव्हा तो झोपला. मग त्याची
फासळी त्याने काढून घेतली आणि ती जागा मांसाने
भरून काढली. २२ मानवातून काढून घेतलेल्या
फासळीची प्रभुदेवाने एक नारी बनवली आणि तिला
मानवाकडे आणले. २३ तेव्हा मानव म्हणाला,

अस्थी ही माझ्या अस्थितली,
मांस असे मम मांसातील;
नरातून ही असे घेतली,
म्हणून नारी हिज म्हणतील.

२४ म्हणूनच पुरुष आपल्या आईबापांना सोडून
आपल्या स्त्रीच्या सहवासात रमतो आणि दोघे एक-
देह होतात. २५ तो पुरुष व ती स्त्री नग्न होती, तरी पण
त्यांना संकोच वाटत नसे.

### मानवाचा आज्ञाभंग

**३** प्रभुदेवाने निर्माण केलेल्या वन्य प्राणिमात्रांमध्ये
सर्प सर्वांत धूर्त होता. त्या स्त्रीला त्याने
विचारलं, "उपवनातल्या कुठल्याही झाडाचं फळ
तुम्ही खाता कामा नये असं खरंच का देवानं तुम्हाला
सांगितलं आहे ?"

२ "उपवनातल्या झाडांची फळं आम्ही खाऊ
शकतो," स्त्रीने सर्पाला उत्तर दिले. ३ "पण
उपवनाच्या मधोमध असलेल्या झाडाचं फळ मात्र
तुम्ही खाऊ नये किंवा त्याला शिवूही नये, नाहीतर
तुम्ही मराल ! असं देव म्हणाला."

४ त्यावर सर्प स्त्रीला म्हणाला, "छे ! तुम्ही
मुळीच मरणार नाही. ५ त्याचं फळ खाल त्याच
दिवशी तुमचे डोळे उघडतील, तुम्ही देवासमान व्हाल
आणि तुम्हाला बरंवाईट कळू लागेल; हे देव जाणून
आहे." ६ त्या झाडाचे फळ चांगले खाण्याजोगे आहे,
दिसायला छान आहे आणि ज्ञानप्राप्ती तर करून
घ्यायला हवी आहे, असे त्या स्त्रीने पाहिले. तेव्हा तिने
ते फळ काढले व खाल्ले. त्याबरोबरच आपल्या
नवऱ्यालाही तिने ते दिले आणि त्यानेही ते खाल्ले. ७
तेव्हा दोघांचेही डोळे उघडले. आपण नग्न असल्याची
त्यांना जाणीव झाली. मग त्यांनी अंजिराच्या झाडाची
पाने जमवून शिवली आणि कमरेला गुंडाळली. ८
त्यानंतर शिळोप्याच्या वेळी प्रभुदेव उपवनातून जात
असताना त्याचा आवाज त्या मानवाने व त्याच्या
स्त्रीने ऐकला. तेव्हा प्रभुदेवाच्या दृष्टीस पडू नये
म्हणून ती दोघे उपवनातल्या झाडाझुडपात लपली. ९
मग देवाने मानवाला हाक मारली व तो त्याला
म्हणाला, "कुठं आहेस तू ?"

१० मानवाने उत्तर दिले, "उपवनात मी तुझा
आवाज ऐकला. मला भीती वाटली आणि मी
तुझ्यापासून लपून राहिलो; कारण मी नग्न आहे. !"

११ "तू नग्न आहेस हे कुणी सांगितलं तुला ?"
देवाने विचारले, "ज्या झाडाचं फळ तू खाता कामा नये
असं मी बजावलं होतं, त्याचं फळ तू खाल्लंस काय ?"

१२ मानवाने उत्तर दिले, "माझ्या जोडीला तू जी
स्त्री दिलीस तिनं ते झाडावरनं काढलं, मला दिलं नि मी
खाल्लं !"

१३ "काय केलंस तू हे?" प्रभुदेव स्त्रीला
म्हणाला.

"सर्पानं मला फसवलं अन् मी खाल्लं !" स्त्रीने
उत्तर दिले.

### देवाघरचा न्याय

१४ मग प्रभुदेव सर्पाला म्हणाला, "तू हे केलंस म्हणून
साऱ्या गुराढोरांत अन् वन्य प्राण्यांत तू शापित झाला
आहेस. तू पोटावर फरफटत जाशील. साऱ्या
आयुष्यभर माती खाशील ! १५ तुझ्यात नि स्त्रीत,
तसंच तुझ्या संततीत व तिच्या संततीत मी वैर निर्माण
करीन. ते तुझं डोकं ठेचतील; तर तू टाचेला दंश
करशील !" १६ स्त्रीला तो म्हणाला, "तुझ्या वेदना
नि गर्भधारणेचे कष्ट मी अनेकपटीने वाढवीन.
प्रसूतीच्या वेदना तुला भोगाव्या लागतील. तरीदेखील
तुझा ओढा नवऱ्याकडे राहील. तो तुझ्यावर अधिकार
गाजवील !"

१७ आदामाला तो म्हणाला, "बायकोचं म्हणणं
तू ऐकलंस अन् ज्या झाडाचं फळ तू खाऊ नयेस असं मी
बजावलं होतं ते तू खाल्लंस ! तुझ्यामुळंच जमीन शापित

झाली आहे. जन्मभर काबाडकष्ट करून तिच्यावर तू
आपले पोट भरशील. १८ ती तुझ्याकरता काटेकुटे व
कुसळं उपजवील. जंगलातील वनस्पती तू खाशील.
१९ निढळाच्या घामानं कमावलेली भाकर तू खाशील
- अगदी ज्या मातीचा तू बनवलेला आहेस त्या
मातीला पुन्हा मिळेपर्यंत ! कारण तू आहेसच माती
अन् फिरून मातीला मिळशील ! "
२० आदामाने आपल्या स्त्रीचे नाव हव्वा असे
ठेवले, कारण ती सगळ्या मानवप्राण्यांची जननी
होती. २१ आदामासाठी व त्याच्या स्त्रीसाठी प्रभुदेवाने
चामड्याचे कपडे बनविले व त्यांना ते घातले.

**उपवनातून रवानगी**

२२ मग प्रभुदेव म्हणाला, आता मानवाला बरेवाईट
समजू लागले आहे. त्यामुळे तो आपल्यापैकीच एक
असा झाला आहे ! आता कदाचित जीवनवृक्षावरचेही
फळ काढून खायला तो आपला हात पुढे करील. तसे
झाले तर तो कायमचा जिवंत राहील. २३ तेव्हा
प्रभुदेवाने त्यांना एदेन उपवनातून बाहेर जायला आज्ञा
केली आणि ज्या जमिनीतून त्याला घडविले होते
तिचीच मशागत करायला लावले. २४ त्याने मानवाला
बाहेर हाकलून लावले आणि जीवन- वृक्षाच्या मार्गावर
पहारा करायला उपवनाच्या पूर्वेला सपक्ष प्राणी[१] व
चोहोकडे परजणारी तळपती तलवार ठेवली.

**काईन व हाबेल**

**THE HOLY BIBLE**
*MARATHI (Common Language)*
MARH-CL-61/10 MARH 322L/87-88/2M/A037
ISBN 81-221-1153-X
Jointly translated by:
The Bible Society of India
and
The Marathi Catholic Bible Commission
Published by:
The Bible Society of India
206 Mahatma Gandhi Road
Bangalore 560 001
PRINTED IN INDIA BY PHOTO OFFSET PROCESS AT
SWAPNA PRINTING WORKS PVT. LTD., CALCUTTA-9.